सहायक आयुक्त, समाज कल्याण व तत्सम गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदलीबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ-२०२५/प्र.क्र. १०३/आस्था-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
तारीखः १७ जून, २०२५.

**प्रस्तावना-**

श्री. सुनिल खमितकर, जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशिव यांच्याविरुध्द बऱीच विभागीय चौकशी प्रकरणे सुरु आहेत. तसेच त्यांच्याविरुध्द सामाजिक संघटनांकडून विविध तक्रारी प्राप्त होत आहेत. श्री. सुनिल खमितकर यांच्या कामकाजाच्या अनुषंगाने मोठया प्रमाणात तक्रारी दाखल होत असून त्यांच्या कामकाजाबाबत तीव्र नाराजी व्यक्त होत आहे. तसेच, मागासवर्गीय विद्यार्थ्यांना वैद्यकीय, अभियांत्रिकी व इतर तत्सम शाखाच्या महाविद्यालयीन प्रवेशाकरिता तातडीने जात वैधता प्रमाणपत्र देणे आवश्यक आहे. याशिवाय आगामी काळात महाराष्ट्र राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थाच्या सार्वत्रिक निवडणूका जाहिर होणार असल्याने जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यावरील पदे भरणे आवश्यक आहे. तसेच सर्व जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समित्यांना विशेष मोहिमा राबवून प्रलंबित प्रकरणे विहित मुदतीत निकाली काढण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. या सर्व पार्श्वभूमिच्या अनुषंगाने श्री. सुनिल खमितकर, जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशिव यांची बदली संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, हिंगोली या रिक्त पदावर बदली करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ ( ४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदीनुसार आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचे आस्थापनेवरील सहायक आयुक्त, समाज कल्याण व तत्सम गट-अ संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अ .क्र. | अधिकाऱ्यांचे नांव | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री. सुनिल खमितकर | जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशिव. | संशोधन अधिकारी, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, हिंगोली. |

२. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता पुढील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१) बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी सदर बदली आदेश प्राप्त होताच बदलीने दर्शविलेल्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे. आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, सबंधित अधिकाऱ्यांनी बदलीच्या पदावर हजर झाल्यानंतर तात्काळ कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्रासह त्यांचा रुजू अहवाल आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांचेमार्फत विहित मार्गाने शासनास न चुकता विनाविलंब सादर करावा.

२) बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांचे पुढील महिन्याचे वेतन हे बदली झालेल्या कार्यालयातूनच आहरीत करण्यात येईल याची दक्षता आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांनी घ्यावी.

३) बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी कार्यमुक्त झाल्यानंतर महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी. इ.) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा “अकार्यदिन” (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४) संबंधित अधिकाऱ्याची शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत, अथवा विचारात घेऊ नयेत.

५) बदली झालेल्या अधिकाऱ्याने सुधारीत बदलीच्या ठिकाणी पदस्थापना मिळण्यासदंर्भात राजकीय व्यक्तीमार्फत किंवा अन्य पदाधिकाऱ्यामार्फत प्रशासनावर दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास सदरची बाब महाराष्ट्र नागरी सेवा ( वर्तणूक ) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल. याची सबंधितानी नोंद घ्यावी. तसेच, संबंधित अधिकारी विहीत कालावधीत बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्यांच्याविरुध्द शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१७१५५९१७१०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMIT VITHAL DHUMAK

Digitally signed by SAMIT VITHAL DHUMAK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT,
2.5.4.20=a6cbff7b4d3ed15df788674ffecd4ae00264aa1850045a1ac17569192ba78bed, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B1CD18FE60131EF608B0E4073778971ADE587A7FD66763006762AEA44424999B, cn=SAMIT VITHAL DHUMAK
Date: 2025.06.17 16:00:04 +05'30'

**( समित धुमक )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) श्री. सुनिल खमितकर, जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशिव
(आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांच्यामार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, पुणे

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशिव

३) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण, संस्था पुणे

४) प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण, छत्रपती संभाजीनगर

५) उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, हिंगोली

६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा ), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर

८) जिल्हा कोषागार अधिकारी, धाराशिव/हिंगोली

९) सह सचिव/सर्व उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

१०) जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, धाराशिव

११) मा. मंत्री (सा. न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१२) मा. राज्यमंत्री (सा. न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१३) प्रधान सचिव (सा. न्या.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई

१४) निवडनस्ती आस्था-२.